कारागृह विभागातील तुरूंगाधिकारी, श्रेणी-२, या संवर्गातील पदोन्नती कोट्यातील पदांची भरती प्रक्रिया पार पाडण्याकरिता राज्यस्तरीय निवड समिती घटित करण्याबाबत.

# महाराष्ट्र शासन
## गृह विभाग
**शासन आदेश क्र.जेएलई-०३२३/प्र.क्र.५२/तुरुंग-१**

दुसरा मजला, मंत्रालय, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मुंबई-३२.
दिनांक : २६ मार्च २०२५.

**संदर्भ :**
१) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, यांच्या कार्यालयाचे पत्र, क्र.कार्यकारी/तु.अ.श्रेणी-२/पदोन्नती-संवर्गातील-पदभरती/१८७४/२०२५/पुणे-०१, दिनांक २४/०२/२०२५.

२) शासन पत्र, गृह विभाग, क्र.जेएलई-०३२३/प्र.क्र.५२/तुरुंग-१, दिनांक २०/०१/२०२५.

३) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, यांचे पत्र, क्र.कार्यकारी/तु.अ.श्रेणी-२/पदोन्नती-संवर्गातील-पदभरती/८८०३/२०२४/पुणे-०१, दिनांक १७/१०/२०२४.

४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं-१२२२/प्र.क्र.५४/का.१३अ, दिनांक ०४/०५/२०२२.

५) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.प्रानिमं-१२२२/प्र.क्र.१३६/का.१३अ, दिनांक २१/११/२०२२.

**प्रस्तावना :-**

उपरोक्त संदर्भ क्र.२ येथील पत्राद्वारे, कारागृह विभागातील तुरूंगाधिकारी, श्रेणी-२, या संवर्गातील पदोन्नती कोट्यातील पदे भरण्यासाठी शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ०४/०५/२०२२ व २१/११/२०२२ यांमधील तरतुदींनुसार "इंस्टीट्यूट ऑफ बँकिंग पर्सोनल सिलेक्शन (IBPS)" या कंपनीमार्फत "ONLINE" परीक्षा घेण्याबाबत अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य,यांना कळविण्यात आले होते.

२. यानंतर ADG (Prisons) यांच्या कार्यालयाने दिनांक २४/०२/२०२५ रोजीच्या पत्राद्वारे केलेल्या विनंतीनुसार कारागृह विभागातील तुरूंगाधिकारी, श्रेणी-२, या संवर्गातील पदोन्नती कोट्यातील पदांची भरती प्रक्रिया पार पाडण्याकरिता निवड समिती घटित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन आदेश :-**

उपरोक्त वस्तुस्थिती व शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, दिनांक ०४/०५/२०२२ यामधील तरतुदींनुसार कारागृह विभागातील तुरूंगाधिकारी, श्रेणी-२, या संवर्गातील पदोन्नती कोट्यातील पदांची भरती प्रक्रिया पार पाडण्याकरिता, याद्वारे, पुढीलप्रमाणे राज्यस्तरीय निवड समिती घटित करण्यात येत आहे :-

| राज्यस्तरीय निवड समिती | | |
|---|---|---|
| १. | अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे | अध्यक्ष |
| २. | कारागृह उप महानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे. | सदस्य सचिव |
| ३. | अ.जा./अ.ज./इ.मा.व. या प्रवर्गांमधून गट अ दर्जाचा एक अधिकारी | सदस्य |
| ४. | अल्पसंख्यांक वर्गातून गट अ दर्जाचा एक अधिकारी *[गट अ दर्जाचा अधिकारी उपलब्ध नसल्यास गट ब (राजपत्रित) दर्जाचा अधिकारी ]* | सदस्य |
| ५. | जिल्हा समाज कल्याण अधिकारी | सदस्य |
| ६. | जिल्हा महिला व बाल विकास अधिकारी | सदस्य |
| *टीप : अध्यक्ष किंवा वरीलपैकी २ ते ६ सदस्यापैकी कोणीही सदस्य महिला नसल्यास अतिरिक्त महिला सदस्याचा समावेश करण्यात यावा.* | | |

सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२६११५०००१२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

SUGRIV SAMBHAJI DHAPATE

Digitally signed by SUGRIV SAMBHAJI DHAPATE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=d02297f9b5e889636956e39bfae4ea112e908c0e9a7e572d4190f9709a817f51, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=FC102DE27DC1B41E747AC6CBB491C4209459C3CF340720EA98FD1D95B19C9F65, cn=SUGRIV SAMBHAJI DHAPATE
Date: 2025.03.26 11:50:56 +05'30'

**(सुग्रिव धपाटे)**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१) प्रधान सचिव (अपील व सुरक्षा), गृह विभाग, यांचे वरिष्ठ स्वीय सहायक, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.

२) अपर पोलीस महासंचालक व महानिरीक्षक, कारागृह व सुधारसेवा, महाराष्ट्र राज्य, पुणे.

**प्रत-**

१) कारागृह उप महानिरीक्षक, पश्चिम विभाग, पुणे.

२) निवड नस्ती, तुरुंग-१.